**दिनांक २२ डिसेंबर, २०२१ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत तेलंगना, हैद्राबाद येथे आयोजित अखिल भारतीय नागरी बास्केटबॉल स्पर्धा २०२१-२२ मध्ये महाराष्ट्राचा संघ सहभागी होण्यासाठी अपेक्षित खर्चास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- अभानासे- ३८२१/प्र.क्र.१३३/क्रीयुसे-२,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- २० डिसेंबर, २०२१.

वाचा:- १. केंद्रीय नागरी सेवा, सांस्कृतिक कार्य आणि क्रीडा मंडळ यांचे पत्र क्रमांक- ५९/२/ २०१९-२०/CCSCSB, दि.०३.१२.२०२१.
२. महासचिव, सचिवालय जिमखान्या यांचे पत्र क्र.-अभानासे/बास्केटबॉल /२०२१-२२ दि.१३.१२.२०२१.
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग,मुंबई यांचे पत्र क्रमांक- उपसंक्री/ अभानासे/२१-२२/का-४/१२४२, दि.१७.१२.२०२१.

**शासन निर्णय :-**

दिनांक २२ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत तेलंगना, हैद्रबाद येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बास्केटबॉल स्पर्धा २०२१-२२ मध्ये भाग घेण्यासाठी महाराष्ट्र शासनाचा संघ निवडण्याकरिता बृहन्मुंबई महानगर पालिका, मुबई, सॅबिना चंद्रशेखर मनोरंजन मैदान,रिक्रीयेशन सोसायटी,श्यामाप्रसाद मुखर्जी चौक, मुबंई येथे दि. १० डिसेंबर, २०२१ रोजी निवड चाचणी आयोजित करण्यात आली होती. या चाचणीमध्ये सहभागी झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांची यादी सोबतच्या विवरणपत्र "क" प्रमाणे तसेच निवड चाचणीद्वारे निवडण्यात आलेल्या राज्याचा संघ विवरणपत्र "अ" प्रमाणे आहे. सदर स्पर्धेची निवड चाचणी, प्रशिक्षण शिबीर तसेच राज्याचा संघ सहभागी होण्यासाठी विवरणपत्र "ब" प्रमाणे होणाऱ्या रु.७८,१५०/-(रुपये अठ्ठयाहत्तर हजार एकशे पन्नास फक्त) इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

२. या साठी उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. स्पर्धेत सहभागी होण्यासाठी संबंधित विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी, खेळाडू/ प्रशिक्षक/ व्यवस्थापक यांना दिनांक २० ते २६ डिसेंबर, २०२१ या कालावधीत प्रशिक्षण शिबिरासाठी व दिनांक २२ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत स्पर्धेत सहभागी होण्यासाठी दिनांक २० डिसेंबर, २०२१ (म.नं.) पासून कार्यमुक्त करावे व या खेळाडूंच्या सेवा सचिवालय जिमखान्यास उपलब्ध करून देण्यात याव्यात. संघातील प्रत्येक खेळाडूने व व्यवस्थापकाने ते ज्यांच्या अधिपत्याखाली काम करीत असतील त्या विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख यांची परवानगी घेणे आवश्यक आहे.

४. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक-एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९, दिनांक ११ मे, १९८९ व क्रमांक-एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ मधील तरतूदींनुसार संघातील खेळाडू, प्रशिक्षक व व्यवस्थापक यांची दि. २० डिसेंबर ते २६ डिसेंबर, २०२१ (प्रशिक्षण शिबीर, स्पर्धा व प्रवास) या काळातील कार्यालयीन अनुपस्थिती "कर्तव्य कालावधी" म्हणून समजण्यात यावी. तसेच त्यांच्या प्रवासभत्ता, दैनिक भत्ता व इतर भत्ते यावर होणारा खर्च संबंधित विभागाच्या/कार्यालय प्रमुखांच्या मुख्य लेखाशिर्षाखाली असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, मुंबईबाहेरील खेळाडूंना अनुज्ञेय असलेला प्रवास/दैनिक भत्ता इ. यासारख्या सवलती या वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक- एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३/अ/सेवा-९,

दिनांक ११ मे, १९८९ व वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक -एलव्हीई-१४०४/प्र.क्र.८/अ/सेवा-८, दिनांक २७ फेब्रुवारी, २००४ नुसार अनुज्ञेय राहतील. या सवलतीचा लाभ मिळण्यासाठी निवड चाचणीसाठी उपस्थिती असणा-या अधिकारी व कर्मचारी यांच्या उपस्थितीबाबत मानद सचिव, सचिवालय जिमखाना यांनी दिलेले प्रमाणपत्र संबंधित कर्मचा-यांनी त्यांच्या आस्थापना कार्यासनात सादर करणे आवश्यक राहिल.

५. स्पर्धेच्या निवड चाचणीसाठी उपस्थित अधिकारी/कर्मचारी (विवरणपत्र-क) यांची कार्यालयीन अनुपस्थिती शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक- एलव्हीई/१४९२/४६/सेवा-९, दिनांक ३० जुलै, १९९२ अन्वये कर्तव्यार्थ म्हणून समजण्यात यावी.

६. सचिवालय जिमखान्याने प्रत्यक्ष खर्चाचे विवरणपत्र कोणत्याही परिस्थितीत आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे तसेच उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना स्पर्धेत केलेल्या खर्चाच्या अहवालासोबत सादर करावे. तसेच शिल्लक राहील्यास, शिल्लक रक्कम उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई यांना त्वरीत परत करण्यात यावी.

७. यासाठी होणारा खर्च सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी “२२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४ क्रीडा व खेळ, (०६) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धा, (०६) (०२) अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धेत सहभाग (२२०४ १९८१), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. सचिवालय जिमखाना यांच्याकडून स्पर्धेचा अहवाल, बाबनिहाय प्रत्यक्ष झालेल्या खर्चाचा तपशील, विनियोग प्रमाणपत्र, परीक्षीतलेखा विवरणपत्र व मंजूरी आदेशातील सर्व अटींची पूर्तता करण्याच्या अटीवर विवरणपत्र"ब" प्रमाणे खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२११५५३०२१९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.12.21 15:59:17 +05'30'

**( स्वा. म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे विभाग, पुणे
३. उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, मुंबई विभाग, मुंबई,
४. जिल्हा क्रीडा अधिकारी, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-४०० ०२१.
६. महालेखापाल (लेखावअनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१/२,मुंबई/नागपूर,
८. वित्त विभाग (व्यय-११), मंत्रालय,मुंबई.
९. मानद महासचिव,सचिवालय जिमखाना, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
१०. संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचे कार्यालये (सचिवालय जिमखान्यामार्फत)
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२).

## विवरणपत्र "अ"

दिनांक २२ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत हैद्राबाद, तेलंगना येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बास्केटबॉल स्पर्धा २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या बास्केटबॉल संघाचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या स्पर्धकांची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव | ट्रॅकसूट | किटबॅग | विभाग/ कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. व्दारकेश अंबादास तायडे, तलाठी | होय | होय | तहसिलदार कार्यालय , संगमेश्वर, देवरुख. |
| २ | श्री. सुनिल शंकरराव शिंदे, कनिष्ठ श्रेणी लिपिक | होय | होय | समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट ७, दौंड. |
| ३ | श्री. पराग रविंद्र दिक्षीत, लघुटंकलेखक | होय | होय | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, गडकरी चौक शिंगाडा तलाव, नाशिक. |
| ४ | श्री. दिनेश नारायण धारपवार, वनरक्षक | होय | होय | वनपरीक्षेत्र कार्यालय, वडाळी ,अमरावती विभाग. |
| ५ | श्री. केदारनाथ चंद्रकांत सोनार, शिपाई | होय | होय | जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, जळगांव. |
| ६ | श्री. सददाम इन्नूस शेख, लिपिक टंकलेखक | होय | होय | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ७ | श्री. अभय चव्हाण, तालुका क्रीडा अधिकारी | होय | होय | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, मुंबई शहर, मुंबई. |
| ८ | श्री. अनुप प्रकाशराव उरेवार, वरिष्ठ लिपिक | होय | होय | ग्रॅन्ट शासकीय वैदयकीय महाविदयालय, मुंबई. |
| ९ | श्री. संदीप औ. कोरेकर, लिपिक टंकलेखक | होय | होय | महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १० | श्री. जुबेर शेख, क्रीडा मार्गदर्शक | होय | होय | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, ठाणे. |
| ११ | श्री. उदय पवार, तालुका क्रीडा अधिकारी | होय | होय | क्रीडा व युवक सेवा संचालनालय, म. रा. पुणे, बालेवाडी. |
| १२ | श्री. चेतन सुखदेव पवार, लिपिक टंकलेखक | होय | होय | विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १३ | श्री. अतुल शि. घोडके, (प्रशिक्षक) | होय | होय | उपविभागीय कृषि अधिकारी, उस्मानाबाद. |
| १४ | श्री.प्रशांत कानगुडे, (व्यवस्थापक) | होय | होय | उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.12.21 15:59:37 +05'30'

**( स्वा . म . नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**विवरणपत्र "ब"**

दिनांक २२ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत हैद्राबाद, तेलंगना येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बास्केटबॉल स्पर्धा २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र शासनाच्या बास्केटबॉल संघासाठी होणाऱ्या खर्चाचे विवरणपत्र.

| क्र. | तपशील | रुपये |
|---|---|---|
| अ) | **निवड चाचणी** | |
| १ | निवड चाचणी पूर्वीचा खर्च (टपाल खर्च, छपाई खर्च) | ५०० |
| ब) | **निवड चाचणी आयोजनाचा खर्च.** | |
| १ | प्रमुख पंच व मदतनीस यांचे मानधन व प्रवास खर्च. | २००० |
| २ | निवड चाचणीस उपस्थित जिमखाना पदाधिकारी /प्रतिनिधी व पंच/ मदतनीस यांच्याकरिता चहा/ अल्पोपहारावरील खर्च. | १००० |
| ३ | १ बास्केट बॉल निवड चाचणीसाठी. | ६५० |
| क) | **प्रशिक्षण शिबीर** | |
| १ | ३ दिवसाचा प्रशिक्षण शिबीराकरिता खेळाडू, व्यवस्थापक/ प्रशिक्षक यांच्या चहा व अल्पोपहारावरील खर्च. | २५०० |
| २ | प्रशिक्षकाचे मानधन (तीन दिवसाकरिता) | २५०० |
| ३ | २ बास्केट बॉल (सरावासाठी) | १३०० |
| ४ | औषधे (रेली स्प्रे) व किरकोळ खर्च. | ५०० |
| ड) | **वैयक्तीक क्रीडा साहित्य खरेदीसाठी होणारा खर्च :-** | |
| १) | १४ ट्रॅकसूट रु. ८००/- प्रमाणे. | १२६०० |
| २) | १४ किटबॅगस् प्रत्येकी रु. ५००/- प्रमाणे. | ७००० |
| ३) | २६ टि शर्टस् रु. ५००/- प्रमाणे. | १३००० |
| ४) | २६ शॉर्टस् रु. ५००/- प्रमाणे. | १३००० |
| ५) | १४ जोडी पायमोजे प्रत्येकी रु. १००/- प्रमाणे. | १४०० |
| ६) | १४ बूटांचे जोड प्रत्येकी रु. ८००/- प्रमाणे. | ११२०० |
| ७) | १४ टॉवेल्स प्रत्येकी रु. १००/- प्रमाणे. | १४०० |
| ८) | १२ निकॅप रु. १५०/- प्रमाणे. | १८०० |
| ९) | १२ रिस्टबॅण्ड रु. १००/- प्रमाणे. | १२०० |
| १०) | १२ सपोर्टर रु. ३००/- प्रमाणे. | ३६०० |
| फ) | **प्रथमोपचाराकरिता खर्च.** | |
| १) | ग्लुकोज / औषधे/ स्प्रे इत्यादीसाठी खर्च व किरकोळ खर्च. | १००० |
| | एकूण :- (रु. ऐंशी हजार सातशे फक्त) | **७८,१५०/-** |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.12.21 15:59:57 +05'30'

**( स्वा . म . नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**विवरणपत्र "क"**

दिनांक २२ ते २५ डिसेंबर, २०२१ या कालावधीत हैद्राबाद, तेलंगना येथे आयोजित करण्यात आलेल्या अखिल भारतीय नागरी सेवा बास्केटबॉल स्पर्धा २०२१-२२ मध्ये भाग घेणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या संघाची निवड करण्यासाठी दिनांक १० डिसेंबर, २०२१ रोजी निवड चाचणीसाठी उपस्थित राहिलेले कर्मचारी खेळाडूंची नावे दर्शविणारे विवरणपत्र.

| क्र. | खेळाडूचे नाव | विभाग/ कार्यालय |
|---|---|---|
| १. | श्री. व्दारकेश अंबादास तायडे , तलाठी | तहसिलदार कार्यालय , संगमेश्वर, देवरख. |
| २. | श्री. सुनिल शंकरराव शिंदे, कनिष्ठ श्रेणी लिपिक | समादेशक, रारापोबल गट ७ दौंड. |
| ३. | श्री. पराग रविंद्र दिक्षीत, लघुटंकलेखक | जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी, गडकरी चौक शिंगाडा तलाव, नाशिक. |
| ४. | श्री. दिनेश नारायण धारपवार, वनरक्षक | वनपरीक्षेत्र कार्यालय, वडाळी ,अमरावती वन विभाग, अमरावती. |
| ५. | श्री. केदारनाथ चंद्रकांत सोनार, शिपाई | जिल्हा ग्रंथालय अधिकारी कार्यालय, जळगांव. |
| ६. | श्री. सद्दाम इन्नूस शेख, लिपिक टंकलेखक | वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ७. | श्री. अभय चव्हाण, तालुका क्रीडा अधिकारी | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, मुंबई शहर. |
| ८. | श्री. अनुप प्रकाशराव उरेवार, वरिष्ठ लिपिक | ग्रॅन्ट शासकीय वैदयकीय महाविदयालय, मुंबई. |
| ९. | श्री. संदीप औ. कोरेकर, लिपिक टंकलेखक | महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १०. | श्री. जुबेर शेख, क्रीडा मार्गदर्शक | जिल्हा क्रीडा अधिकारी कार्यालय, ठाणे. |
| ११. | श्री. उदय पवार, तालुका क्रीडा अधिकारी | क्रीडा व युवक सेवा संचालनालय, म. रा. पुणे, बालेवाडी. |
| १२. | श्री. चेतन सुखदेव पवार, लिपिक टंकलेखक | विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १३. | श्री. रविंद्र मंजुळे, लिपिक टंकलेखक | गृह विभाग, मंत्रालय, मुंबई |
| १४. | श्री. अतुल शि. घोडके, लिपीक टंकलेखक | उपविभागीय कृषि अधिकारी, उस्मानाबाद. |
| १५. | श्री.प्रशांत कानगुडे, लिपिक टंकलेखक | उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १६. | श्रीमती मंगल नाखवा, कक्ष अधिकारी | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| १७. | श्रीमती अपर्णा जाधव, सहा.कक्ष अधिकारी | विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई. |

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: CN = Swati Madhukar Nanal, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA
Date: 2021.12.21 16:00:14 +05'30'

**(स्वा . म . नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**